महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : इपीपी-1088/(359)/सेयो-1,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - 400 032,

दिनांक : 21 मार्च, 1995.

पहावे :- 1) नियोजन विभागाचे शासन निर्णय क्र. ईएमपी-1074/पी-4,
दिनांक : 3.12.1974.

2)नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. ईएमपी-1074/5678/पी-4,
दिनांक : 14.2.1975

महाराष्ट्र राज्यात सेवायोजन कार्यालयात नांव नोंदविलेल्या सुशिक्षित बेरोजगारांना नोक-या मिळण्यासाठी सहाय्य व्हावे म्हणून नियोजन मंडळाने आखून दिलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार रोजगार प्रोत्साहन कार्यक्रम योजना सन 1973-74 पासून शासनाने कार्यान्वित केली आहे. या प्रयोजनासाठी सुशिक्षित बेरोजगारांची व्याख्या, ज्या व्यक्तीचे वय 18 वर्षे पूर्ण असून किमान शिक्षण शालांत परीक्षा उत्तीर्ण किंवा औद्योगिक प्रशिक्षण संस्थेची परीक्षा उत्तीर्ण असून ती व्यक्ती महाराष्ट्र राज्यात अधिवास असलेली स्थानिक असली पाहिजे. या योजनेनुसार उमेदवारांना विविध व्यवसायाचे प्रशिक्षण कार्यक्रम, खाजगी आस्थापनात व शासनाच्या अंगीकृत व्यवसायात कार्यान्वित करण्यात येतो. या कार्यक्रमांतर्गत उद्योजकांनी अधिसूचित केलेल्यां प्रशिक्षणासाठी ( Training Slots) इच्छूक सुशिक्षित बेरोजगार उमेदवारांना सहा महिन्याचे प्रशिक्षण साठी पाठवणी करण्यात येते. या कार्यक्रमाचे उद्दिष्ट असे आहे की, उमेदवारांना विविक्षित व्यवसायातील / क्षेत्रातील कसब प्राप्त व्हावे, किंवा त्यांचे कसब वाढावे, जेणेकरून प्रशिक्षण पूर्ण झाल्यावर ते नियमित नोकरीत योग्य पगारावर नेमण्यासाठी उद्योजकांना सहज स्वीकार्य व्हावे. या कार्यक्रमाचा असाही एक उद्देश आहे की, सुशिक्षित बेरोजगार उमेदवारांनी पगारी नोकरीच्या शोधात राहून निराश न होता, प्रशिक्षण पूर्ण झाल्यावर त्यांना हिमतीने स्वंरोजगार सुरु करणे शक्य व्हावे. प्रशिक्षणाच्या कालावधीमध्ये प्रशिक्षणार्थ्यांना त्यांच्या शैक्षणिक पात्रतेनुसार दरमहा रु. 100/- ते 400/- विद्यावेतन देण्यात येत होते. हे दर सुधारित करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :- राज्यातील सुशिक्षित बेरोजगारांसाठी कार्यान्वित असलेली रोजगार प्रोत्साहन कार्यक्रम योजना (Employment Promotion Programme) अंतर्गत विद्यावेतनात वाढ करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सुधारित दर दिनांक 2 ऑक्टोबर, 1994 पासून खालीलप्रमाणे अंमलात येतील :-

| अ.क्र. | शैक्षणिक पात्रता | विद्यावेतन |
|---|---|---|
| 1. | शालांत परीक्षा उत्तीर्ण, औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचे प्रमाणपत्र धारक आणि तंत्र परंपरेने स्वतःच्या व्यवसायाचे ज्ञान असलेले व हस्तशिल्पी ज्ञान अवगत असलेले कारागीर. | रु. 300/- |
| 2. | पदवीधर (कला, शास्त्र, आणि वाणिज्य ) | रु. 500/- |
| 3. | अभियांत्रिकी, तंत्रज्ञान, कृषि, पशुवैद्यकीय, वास्तुशास्त्र, वैद्यकीय शास्त्र आणि व्यावसायिक अभ्यासक्रम यांचे पदविकाधारक. | रु. 700/- |
| 4. | कला, शास्त्र व वाणिज्य शाखेमध्ये पदव्युत्तर शिक्षण घेतलेले उमेदवार कृषि, पशुवैद्यकीय, वैद्यकीय, दंतशल्यचिकित्सक, औषधनिर्मिती पदवीधर आणि बी.ए. बी.एड./ बी.ए., बी.कॉम किंवा यासारखे द्विपदवीधर किंवा पदव्युत्तर पदवीधर व तत्सम. | रु. 800/- |
| 5. | अभियांत्रिकी, तंत्रज्ञान व वास्तुशास्त्र शाखेतील पदवीधर व तत्सम | रु. 1,000/- |

2. सेवायोजनमधील बेरोजगार उमेदवारांचा प्रशिक्षण कालावधी सहा महिन्यांचा असेल. सेवायोजन संचालकांनी या योजनेअंतर्गत वर्षाकरिता ठरवून दिलेले उद्दिष्ट साध्य केले जाईल, अशारितीने शासनाचे अंगीकृत व्यवसाय, खाजगी आस्थापना, विविध सहकार क्षेत्रे यांच्याशी प्रत्यक्ष संपर्क साधावा.

3. विद्यावेतनातील मंजूर केलेली वाढ सन 2 आक्टोबर, 1994 पासून अंमलात येईल, जे उमेदवार 2 ऑक्टोबर, 1994 ला प्रशिक्षण घेत असतील,त्यांनाही त्यांचा प्रशिक्षणाच्या उर्वरित काळाकरिता याचा लाभ देण्यात येईल.

4. या योजनेवर होणारा खर्च '2230, कामगार व सेवायोजन, 02-सेवायोजन, 004 सेवायोजन, संशोधन, सर्वेक्षण व सांख्यिकी, 004 (दोन) (बी) सुशिक्षित बेरोजगारांसाठी प्रशिक्षण कार्यक्रम (रोजगार प्रोत्साहन कार्यक्रम योजना) (इ.पी.पी.)' हया शिर्षाखाली मंजूर होणा-या योजनांतर्गत तरतुदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन/वित्त विभाग यांच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. 835/व्यय-5, दिनांक 19.12.1994 अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

त्रिं ब. सेन,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत अग्रेषित :-

1. मुख्यमंत्र्यांचे सचिव
2. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
3. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
4. सचिव, महसूल विभाग
5. सर्व सचिव, महाराष्ट्र राज्य
6. वित्त विभाग /(व्यय-5), मंत्रालय, मुंबई-32
7. सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य
8. संचालक, सेवायोजन, कोकणभवन, नवी मुंबई.
9. मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख व कार्यालयप्रमुख



...3...

10. सर्व जिल्हाधिकारी
11. संचालक, माहिती व जनसंपर्क
12. संचालक, अर्थ व सांख्यिकी, मुंबई
13. संचालक, समाजकल्याण, पुणे.
14. सर्व तहसीलदार
15. महालेखापाल, महाराष्ट्र -1 मुंबई ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा )
16. महालेखापाल, महाराष्ट्र -2 नागपूर ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा )
17. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
18. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
19. सर्व जिल्हा कोषाधिकारी
20. सर्व उपकोषाधिकारी
21. उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभागाचे सर्व कार्यासन अधिकारी
22. निवड नस्ती - सेयो-1